**राज्य सेवा परीक्षेद्वारे शिफारसपात्र उमेदवारांना एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत प्रशिक्षणास रुजू होण्यासाठी द्यावयाच्या मुदतवाढीचे निकष.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टिआरएन- ०२१८/प्र.क्र.०६/सीपीटीपी**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ७ ऑगस्ट, २०१८.

**वाचा -**

१) **शासन निर्णय क्रमांकः टीआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२अ, दि.२०/०१/२०१४.**
२) **शासन निर्णय क्रमांकः टीआरएन २०१४/प्र.क्र.०२/१४/१८ ब, दि.०३/०६/२०१४.**
३) **शासन निर्णय क्रमांकः टीआरएन ४१५/प्र.क्र.४७/१५/१८ब, दि. २४/०४/२०१५.**
४) **शासन निर्णय क्रमांक टिआरएन ०८१५/ प्र.क्र. ११५/१५/१८ब, दि.२०/०४/२०१६**
५) **शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग दिनांक ७ नोव्हेंबर, २०१५**
६) **शासन निर्णय क्रमांक टिआरएन ०६१७ / प्र.क्र. ४२ / सीपीटीपी, दि.०३/०७/२०१७ व समक्रमांकित शुध्दीपत्रक दिनांक १२/०७/२०१७.**

**प्रस्तावना**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्य सेवा परीक्षेद्वारे सरळसेवेने गट अ व गट ब मध्ये नियुक्त होणाऱ्या विविध संवर्गातील अधिकाऱ्यांचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे व वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमार्फत सुरु करण्याचा निर्णय शासनाने वरील अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. या शिफारसपात्र उमेदवारांकडून एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमास हजर होण्यासाठी विविध कारणास्तव मुदतवाढ मिळण्याबाबत विनंती अर्ज प्राप्त होतात. उमेदवारांकडून प्राप्त विनंतीसंदर्भात सांगोपांग विचारविनिमय करुन काही विशिष्ट कारणांसाठी एक वर्ष मुदतवाढ देण्यात येते. यासंदर्भातील यापूर्वीचे अ.क्र. १ ते ४ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन शासन निर्णय दिनांक ०३/०७/२०१७ व त्यावरील दिनांक १२/७/२०१७ च्या शुध्दीपत्रकान्वये एकत्रित प्रशिक्षण कार्यक्रमास रूजू होण्यापासून मुदतवाढ घेण्यासाठी निकष निश्चित करण्यात आले आहेत. या मुदतवाढ घेतलेल्या उमेदवारांच्या ज्येष्ठतेबाबत दिनांक ७.११.२०१५ च्या अधिसुचनेतील तरतूदीनुसार, प्रशिक्षणासाठी मुदतवाढ मंजूर झालेल्या उमेदवारांची सेवाज्येष्ठता ही, ते प्रशिक्षण घेत असलेल्या म्हणजेच नंतरच्या तुकडीमध्ये निवड झालेल्या उमेदवारांच्या वर निश्चित होत असल्याने सदर उमेदवार प्रशिक्षणामध्ये सक्रिय सहभाग नोंदवत नसल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. त्यामुळे मुदतवाढ घेतलेल्या उमेदवारांच्या सेवाज्येष्ठतेचे निकष सुधारित करुन मुदतवाढ व सेवाज्येष्ठतेबाबत सर्वसमावेशक एकत्रित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :

वर नमूद केल्याप्रमाणे उक्त ' वाचा ' येथील अ. क्र. ६ येथे नमूद दिनांक ३ जुलै, २०१७ चा शासन निर्णय व त्यावरील दिनांक १२ जुलै, २०१७ चे शुध्दीपत्रक अधिक्रमित करण्यात येत आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्य सेवा परीक्षेद्वारे सरळसेवेने गट-अ व गट-ब मध्ये शिफारस होणा-या उमेदवारांनी विनंती केल्यास खालील निकषांच्या आधारे १ वर्षाकरीता मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देत आहे.

१) शिफारसप्राप्त महिलांना, त्यांनी वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीवर प्रसुतीच्या कारणास्तव व एक वर्षाच्या आतील अपत्यांच्या संगोपनासाठी,

२) शिफारसप्राप्त उमेदवारांना शिफारशीनंतर गंभीर अपघात झालेला असल्यास किंवा गंभीर आजार असल्याचे निदान झाल्यास,

३) केंद्रीय लोकसेवा आयोगाच्या पूर्व परीक्षेस बसलेल्या उमेदवारांना मुख्य परीक्षेच्या तयारीसाठी, परीक्षेच्या आवेदनापत्राची छायांकित प्रत अर्जासोबत सादर केल्यास १ वर्षाची मुदतवाढ देण्यात येईल

४) राज्य सेवा पूर्व परीक्षेच्या निकालानुसार मुख्य परीक्षेसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांना मुख्य परीक्षेच्या तयारीसाठी, परीक्षेच्या आवेदनपत्राची छायांकित प्रत व राज्य सेवा मुख्य परीक्षेसाठी पात्र ठरल्याचा पुरावा तपासून १ वर्षाची मुदतवाढ देण्यात येईल.

५) राज्य सेवा परीक्षेद्वारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत गट-अ व गट-ब पदासाठी निवड करण्यात आलेल्या उमेदवारास परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी त्याच्या एकूण निवड प्रक्रीयेमध्ये एक वर्षासाठी मुदतवाढ घेण्याची केवळ एक संधी देण्यात येईल. त्यानुसार उमेदवारांनी प्रशिक्षण कार्यक्रमासाठी मुदतवाढ घेण्यासाठी शासनाकडे अर्ज सादर करताना " यापूर्वी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत अंतर्भूत असणाऱ्या अन्य कोणत्याही पदावरील निवडप्रकीयेसाठी मुदतवाढ घेण्यात आली नाही" असे नमूद करणे बंधनकारक राहिल.

६) वरील निकषांच्या आधारे मुदतवाढ प्राप्त केलेला उमेदवार त्याची त्या तुकडीतील त्या संवर्गातील सेवाज्येष्ठता गमावेल.अशा उमेदवाराची सेवाज्येष्ठता ते एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाच्या ज्या तुकडीमध्ये प्रशिक्षणासाठी रुजू होतील, त्या तुकडीतील त्या संवर्गात गुणानुक्रमे राहिल.

२. उपरोक्त निकष राज्य सेवा परीक्षा २०१७ द्वारे शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांसह आगामी काळात राज्य सेवा परीक्षेद्वारे शिफारस होणाऱ्या उमेदवारांना लागू राहतील.

३. उक्त परिच्छेद १ (६)मधील तरतूदींच्या अनुषंगाने वाचा येथे नमूद अ. क्र. ५ येथील अधिसुचनेच्या संबंधित कलमामध्ये आवश्यक त्या सुधारणा करण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०७१५०३५४३६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
Date: 2018.08.07 15:10:53 +05'30'

**(वि. रा. ठाकूर)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-३२
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ( **पत्राद्वारे ),
७. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था, वनामती, नागपूर
८. सह सचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
९. उप सचिव (व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१०.निवड नस्ती, कार्यासन सीपीटीपी